**अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयास स्वतंत्र तपासाचे व नियंत्रणाचे अधिकार देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : व्हीआयपी-०९२२/प्र.क्र.१०२/पोल-१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :** २३ जुलै, २०२४

**संदर्भ :**

१) पोलीस महासंचालक कार्यालय यांचे क्र. पोमसं/२६-ब/आर्थिक गुन्हे शाखा/पुनर्रचना/६२/२०१९, दि. १३ सप्टेंबर, २०२२ व दिनांक १७ नोव्हेंबर, २०२२ रोजीचे पत्र.

२) गृह विभाग, शासन अधिसूचना क्रमांक व्हीआयपी-०९२२/प्र.क्र. १०२/पोल-१३, दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३

**प्रस्तावना :**

राज्यातील वाढती लोकसंख्या, शहरीकरणात होणारी वाढ, औद्योगीकरण, तंत्रज्ञान व संगणकीकरणाच्या अनुषंगाने ई-पेमेंटव्दारे होणारे व्यवहार, बांधकाम व्यवसाय तसेच अन्य विविध क्षेत्रातील व व्यापार उद्योग धंद्यातील व्यवहारातून होणारे आर्थिक घोटाळे, आर्थिक फसवणूक इत्यादींमध्ये फार मोठ्या प्रमाणात वाढ होत आहे. त्यासाठी भविष्यात शासन, न्यायप्रणाली व इतर क्षेत्रातील व्यवसायिक तज्ञ, तपास अंमलदार/अधिकारी यांचेशी संपर्क ठेवणे व समन्वय साधून त्यावर उपाययोजना करणे व नियंत्रण ठेवणे गरजेचे होते. त्याचप्रमाणे, राज्यामधील पोलीस ठाण्यांमधून दाखल आर्थिक गुन्ह्यांच्या न्यायप्रविष्ठ असलेल्या प्रकरणांचा निपटारा जलद गतीने करण्यासाठी व सदर गुन्हयांवर नियंत्रण आणून त्यांना आळा घालण्यासाठी, पर्यायाने जिल्हयांमधील पोलीस अधीक्षकांवर नियंत्रण ठेवून, मा. उच्च न्यायालय, मा. जिल्हा न्यायालय व स्थानिक न्यायालयातील प्रकरणांचा/गुन्हयांचा आढावा घेऊन त्यांना मार्गदर्शन करुन देखरेख करणे इत्यादी पर्यवेक्षीय कामकाजासाठी व राज्यातील वाढती आर्थिक गुन्हेगारी व भ्रष्टाचारास आळा घालून राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात वर्ग केलेल्या पोलीस उपअधीक्षकांवर नियंत्रण, मार्गदर्शन व आर्थिक गुन्ह्यांच्या तपासात सुसुत्रता आणण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे) हे पद व इतर सहाय्यकारी पदे दिनांक १० मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली आहेत.

वाढत्या आर्थिक गुन्हेगारीच्या पार्श्वभूमीवर तपासाची कार्यक्षमता व गुणवत्ता वाढविण्यासाठी तसेच राज्यातील आर्थिक गुन्हयांवर नियंत्रण व तपासात सुसुत्रता आणण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयास तपासाचे अधिकार देण्याबाबत संदर्भ क्रमांक २ येथे नमूद शासन अधिसूचना प्रसिद्ध करण्यात आली आहे. त्यानुसार, अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयांतर्गत नियुक्त तपासी पोलीस अधिकाऱ्यास (पोलीस उपनिरीक्षक व त्यावरील दर्जाचे अधिकारी) संबंधित गुन्ह्याच्या कार्यक्षेत्रापुरते पोलीस ठाणे प्रभारी अधिकारी घोषित करण्यात आले आहे.

तसेच, पोलीस महासंचालक कार्यालयाकडून संदर्भ क्रमांक (१) येथे नमूद प्रस्तावाच्या अनुषंगाने, अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयास स्वतंत्र तपासाचे अधिकार व तपासावर नियंत्रणाचे अधिकार देण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

राज्यातील आर्थिक गुन्हयांवर नियंत्रण आणण्यासाठी व तपासात सूसुत्रता आणण्यासाठी अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयास आर्थिक गुन्हे अन्वेषणासंबंधी खालील प्रमाणे अधिकार देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

१) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य हे पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या मार्गदर्शन व नियंत्रणाखाली काम करतील.

२) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा हे मा. सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय, महाराष्ट्र शासन व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे कडून आदेशित करण्यात आलेल्या गुन्ह्यांचा तपास करतील. तसेच, अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाकडे प्राप्त होणा-या थेट तक्रारी संदर्भातील आवश्यकतेनुसार प्राथमिक चौकशी अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून अथवा ते नामनिर्देशीत करतील अशा अधिका-यांकडून करण्यात येईल.

३) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई खालील स्वरूपाच्या आर्थिक गुन्ह्यांचा तपास/चौकशी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या पूर्वमान्यतेने करतील :-

अ) ज्या गुन्ह्यांमध्ये रु. १० कोटी व त्यापेक्षा जास्त रक्कम गुंतलेली आहे असे गुन्हे,

आ) ज्या आर्थिक गुन्ह्यांची व्याप्ती आंतरराज्यीय/आंतरदेशीय आहे असे गुन्हे,

इ) ज्या गुन्ह्यांचे स्वरुप संवेदनशील व क्लिष्ट आहे व मोठ्या सांख्यिकी स्वरूपाचे आर्थिक गुन्हे,

ई) ज्या गुन्ह्यांची व्याप्ती पूर्ण महाराष्ट्र राज्यात आहे असे गुन्हे

४) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा हे त्यांचेकडे सोपविण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये चौकशीअंती गुन्हा घडल्याचे प्राथमिकदृष्ट्या निदर्शनास आले तर सदर गुन्हे पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या पूर्वपरवानगीने स्थानिक पोलीस स्टेशन मध्ये गुन्हा दाखल करुन त्याचा तपास करतील.

५) आर्थिक गुन्हे शाखेकडे तपासात असणा-या आर्थिक गुन्ह्यांच्या अनुषंगाने प्राथमिक चौकशी करणे, झडती घेणे, अटकेची कार्यवाही करणे, चार्जशीट दाखल करणे, अंतिम अहवाल दाखल करणे इ. करिता मान्यता देण्याचे अधिकार अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील सक्षम प्राधिकारी यांना असतील.

६) उपरोक्त मुद्दा क्रमांक (५) च्या अनुषंगाने अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील सक्षम प्राधिकारी यांच्या विहित मर्यादेबाबत अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा हे पोलीस महासंचालक यांच्या मान्यतेने आवश्यक सूचना/आदेश निर्गमित करतील.

**७) सनियंत्रण व पर्यवेक्षण :**

अ) ज्या आर्थिक गुन्हयांची व्याप्ती रुपये १० कोटींपेक्षा जास्त आहे परंतु त्याचा तपास अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाकडे नाही अशा गुन्ह्यांच्या तपासावर;

आ) पोलीस महासंचालक निर्देशित करतील अशा इतर कोणत्याही आर्थिक गुन्ह्यांच्या तपासाशी संबंधीत जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त (अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे यांच्यापेक्षा पदाने कनिष्ठ असलेले) यांच्यावर.

उपरोक्त (अ) आणि (आ) यांवर अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे सनियंत्रण व पर्यवेक्षण राहील.

८) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य हे त्यांच्या अधिपत्याखालील कोणत्याही अधिका-याकडील कोणत्याही गुन्ह्याचा तपास पुढील कार्यवाहीसाठी त्यांच्याकडे घेऊ शकतात. तसेच, सार्वजनिक हित विचारात घेऊन आवश्यकतेनुसार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र

राज्य किंवा अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य त्यांच्या कार्यक्षेत्रातील तपास हस्तांतरीत करू शकतात.

९) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे कार्यालयाची कार्यकक्षा (मुंबई वगळता) संपूर्ण महाराष्ट्र असेल.

१०) आर्थिक गुन्ह्यांच्या चौकशी व तपास पध्दतीबाबत राज्य पोलीस दलातील अधिकारी/कर्मचारी यांना मार्गदर्शक सूचना व प्रशिक्षण देणे.

११) आर्थिक गुन्हे व गुन्हेगार यांचा गुन्हे कार्यप्रणाली नुसार व आयुक्तालय व जिल्हानिहाय वेगवेगळे अभिलेख तयार करुन अद्ययावत करणे तसेच गुन्ह्यांच्या संकलित माहितीचे विश्लेषण करुन स्वयंप्रेरित (Pro Active) उपाययोजना सुचविणे.

१२) वेळोवेळी झालेले शासन निर्णय/आदेश, न्यायनिर्णय, विविध शासन स्थापित आयोग यांचे आदेशानुसार तसेच सदर क्षेत्रात काम करणारे शासकीय विभाग व आर्थिक संस्था अशा संबंधितांशी समन्वय साधणे व सल्लागार म्हणून काम पाहणे.

१३) शासन/पोलीस महासंचालक यांचे वतीने अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा हे आर्थिक गुन्ह्यासंदर्भात समन्वयक व सल्लागार तसेच नोडल अधिकारी म्हणून काम पाहतील.

१४) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, महाराष्ट्र राज्य हे देशातील इतर राज्यांच्या समकक्ष अधिकाऱ्यांशी समन्वय साधतील जेणेकरुन माहिती/गुप्तचराचा प्रसार आणि आदान-प्रदान करता येईल. तसेच, केंद्रीय एजन्सी, वित्तीय संस्था, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया आणि इतर संबंधित संस्थांशी समन्वय साधतील.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०७२३१५२५५७११२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2024.07.23 15:37:39 +05'30'

**( डॉ. सुग्रिव धपाटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई.
२) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स.,मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अपर पोलीस महासंचालक (आर्थिक गुन्हे शाखा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती)
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य.
९) मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०) मा.मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक.
१२) सर्व पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त.
१३) निवड नस्ती.(पोल-१३)